महाराष्ट्र नागरी सेवा (रजा) नियम, 1981
चा नियम 73(1)(डी)

अर्जित रजेवर असताना प्रत्यार्पित केलेली अर्जित रजा एका वेळी उपभोगण्याच्या मर्यादेमध्ये वाढ.

महाराष्ट्र शासन
वित्त विभाग
शासन निर्णय, क्रमांक:अरजा-2494/72/सेवा-9
मंत्रालय, मुंबई 400 032. दिनांक 5 एप्रिल 1995.

## शासन निर्णय

शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक अरजा-2491/45/सेवा-9, दिनांक 20 सप्टेंबर 1991 अन्वये महाराष्ट्र नागरी सेवा (रजा) नियम, 1981 च्या नियम 50(2) व (3) मधील राज्य शासकीय कर्मचाऱ्यांना एका वेळी अर्जित रजा उपभोगण्याची मर्यादा 120 दिवसावरुन 180 दिवस इतकी वाढविण्यात आली आहे. उक्त आदेशाचा परिणाम म्हणून नियम 73(1)(डी) मध्ये उल्लेखिलेली 120 दिवस ही मर्यादासुध्दा 180 दिवस इतकी वाढविण्यात येत आहे.

2. वरील आदेश हे दिनांक 2 सप्टेंबर 1991 पासून अंमलात येतील.

3. महाराष्ट्र नागरी सेवा (रजा) नियम, 1981 च्या नियम 73(1)(डी) मधील तरतुदींमध्ये आवश्यक त्या सुधारणा यथावकाश करण्यात येतील.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

वि.अ. देशपांडे,
शासनाचे उप सचिव.

प्रत

महालेखापाल-1 (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, मुंबई (80 प्रती)
महालेखापाल-2 (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, नागपूर (80 प्रती)
महालेखापाल-1 (लेखापरीक्षा), महाराष्ट्र, मुंबई (40 प्रती)
महालेखापाल-2 (लेखापरीक्षा), महाराष्ट्र, नागपूर (40 प्रती).
महालेखापाल (वाणिज्य लेखापरीक्षा), मुंबई
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई (40 प्रती)
संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई
निवासी लेखापरीक्षा अधिकारी, मुंबई (5 प्रती)

(कृ.मा.प.)

शासमु-रोटा-मिवि-एच-130(12,000+10-4-95)

* सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई
* सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई
* प्रबंधक, मूळ न्याय शाखा, महाराष्ट्र राज्य, उच्च न्यायालय, मुंबई
* प्रबंधक, अपील शाखा, महाराष्ट्र राज्य, उच्च न्यायालय, मुंबई
* प्रबंधक, लोक आयुक्त व उप लोक आयुक्त यांचे कार्यालय, मुंबई

मुख्य लेखापरीक्षा अधिकारी, स्थानिक निधी लेखा, नवी मुंबई

मुख्य मंत्र्यांचे सचिव

मंत्री व राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव

राज्यपालांचे सचिव

विभागीय आयुक्त, मुंबई/पुणे/औरंगाबाद/नागपूर/नाशिक/अमरावती

सर्व मंत्रालयीन विभाग

मंत्रालयाच्या निरनिराळ्या विभागांच्या अधिकाराखाली असलेल्या सर्व विभागांचे व कार्यालयांचे प्रमुख

विशेष आयुक्त, महाराष्ट्र सदन, नवी दिल्ली

वित्त विभागातील सर्व कार्यासने, (ग्रंथपाल 5 प्रती)

निवड नस्ती - कार्यासन सेवा-७, वित्त विभाग.

---

* पत्राने